**विद्युत निरीक्षणालयातील अधीक्षक अभियंता, गट-अ (राजपत्रित) या संवर्गातील अधिकाऱ्यांचे वयाच्या ५०/५५ व्या वर्षानंतर सेवा पुनर्विलोकन करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग**
**शासन निर्णय: मुविनि-२०२४/प्र.क्र.१९८/ऊर्जा-१**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०००३२.
दिनांक: १७ फेब्रुवारी, २०२५.

**संदर्भ:** १) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.एलपीएल-२०१७/प्र.क्र.२१/का.पंधरा, दि. १०/०६/२०१९.
२) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्र. मुविनि-२०१९/प्र.क्र.१६१/ऊर्जा-५, दि. २४/०२/२०२०.

**शासन निर्णय:**

महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतन) नियम १९८२ च्या नियम १० (४) व नियम ६५ अनुसार सार्वजनिक हितास्तव अकार्यक्षम व संशयास्पद सचोटीच्या अधिकारी / कर्मचाऱ्यांना वयाच्या ५०/५५ व्या वर्षी अथवा ३० वर्षे अर्हताकारी सेवा यापैकी जे अगोदर घडेल त्यावेळी, त्यांचे सेवा पुनर्विलोकन करून त्यांना शासन सेवेतून मुदतपूर्व सेवानिवृत्त करावे, असे शासनाचे धोरण आहे. त्याअनुषंगाने सामान्य प्रशासन विभागाने संदर्भ क्र. १ येथील शासन निर्णयान्वये सेवापुनर्विलोकनासंबंधी कार्यपध्दती व सर्वसाधारण सूचना विहित केल्या आहेत.

२. संदर्भ क्र. २ येथील शासन निर्णयान्वये गठीत केलेल्या अपर मुख्य सचिव (ऊर्जा) यांच्या अध्यक्षतेखाली विभागीय पुनर्विलोकन समितीने श्री.हेमंत नारायण गांगुर्डे, अधीक्षक अभियंता, गट-अ (राजपत्रित) यांना त्यांच्या वयाच्या ५०/५५ व्या वर्षी अथवा ३० वर्षे अर्हताकारी सेवा यापैकी जे अगोदर घडेल त्यानंतर सेवेत राहण्यासाठी समितीने केलेल्या शिफारशीनुसार पात्र ठरविण्यात येत आहे.

३. याबाबतची वयाच्या ५०/५५ वर्षानंतर किंवा अर्हताकारी सेवेची ३० वर्षे पूर्ण झालेनंतर पुढे सेवा चालू ठेवण्यास मान्यता मिळाल्याबाबतची नोंद त्यांच्या सेवापुस्तकात घेण्यात यावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२५०२१७१७२६१७५३१० असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PRADIP DATTATRAY BHINTADE

Digitally signed by PRADIP DATTATRAY BHINTADE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRIES ENERGY LABOUR AND MINING DEPARTMENT, 2.5.4.20=148166d6ba6b6b7506a6c02726418297ae7252d6770d6eeda6fcf82676c59eb5, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=70AB5B7C0DEE32FCEE54C2D940368CB9D34A7AEDC3404176B7D9B0082921CFF0, cn=PRADIP DATTATRAY BHINTADE
Date: 2025.02.17 17:27:50 +05'30'

**( प्रदिप भिंताडे )**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१) मा.मुख्यमंत्री, (ऊर्जा ) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
२) अपर मुख्य सचिव (ऊर्जा) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
३) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा), १/२, मुंबई/नागपूर.
४) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई/नागपूर.
५) मुख्य विद्युत निरीक्षक, ३ रा मजला, प्रशासकीय इमारत, रामकृष्ण चेंबूरकर मार्ग, चेंबूर (पूर्व), मुंबई.
६) अधीक्षक अभियंता, प्रादेशिक विद्युत निरीक्षण मंडळ, पुणे.
७) श्री.हेमंत नारायण गांगुर्डे, अधीक्षक अभियंता (मुख्य विद्युत निरीक्षक, मुंबई यांच्यामार्फत.)
८) निवडनस्ती (ऊर्जा-१).